पीक पैसेवारी पध्दतीबाबत सर्वसमावेशक
शासन निर्णय.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय- २०१३/ प्र.क्र.२०७/म-७
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०३ नोव्हेंबर, २०१५

वाचा :- १) शासन ठराव क्रमांक :- एससीवाय- १३८३/ प्र.क्र.१५७/म-७,(१)
दिनांक ४ मार्च ,१९८९.
२) शासन ठराव क्रमांक :- एससीवाय- १३९६/ प्र.क्र.२२७/म-७,
दिनांक १५ जुलै १९९७.
३) शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय- २०१३/ प्र.क्र.२०७/म-७,
दिनांक ६ एप्रिल २०१३.

प्रस्तावना :-

सन १८८४, १९२७ व १९४४ यावर्षी भूतपूर्व मुंबई राज्यातील सर्व प्रमुख पिकांच्या समाधानकारक उत्पन्नाचे तक्ते कृषि विभागाने बनविले होते. या तक्त्यांची पिकांच्या उत्पन्नांशी तुलना करून आणेवारी काढली जात असे. हे तक्ते चांगल्या किंवा समाधानकारक वर्षामधील अपेक्षित उत्पन्नांच्या अंदाजावर तयार करण्यात येत असत. त्यामुळे त्यांना शास्त्रीय पाया काहीच नव्हता. या कालखंडात समाधानकारक पिकांच्या उत्पन्नापेक्षा जर निम्म्यापेक्षा कमी उत्पन्न आले तर शेतसाऱ्यात सूट दिली जात असे.

१९६२ साली प्रथमत: श्री.व्ही.एन.जोशी, तत्कालीन सचिव, महसूल यांनी पिक पैसेवारीच्या संदर्भात शास्त्रोक्त पाया असलेली पद्धत नक्की केली. त्यांनी आखुन दिलेली पद्धत सन १९६४-६५ पासून लागू करण्यात आली. तद्नंतर सन १९७१ साली श्री.व्हि.एम.दांडेकर यांचे अध्यक्षतेखाली या विषयावर विचार करण्यासाठी एक समिती नेमण्यात आली. या समितीने सुचविलेली पद्धत सन १९७४-७५ पासून अमलात आली. तद्नंतर दिनांक ५ मार्च, १९८४ रोजी तत्कालीन विधानसभा सदस्य श्री. भगवंतराव गायकवाड यांच्या अध्यक्षतेखाली या विषयाचा पुनर्विचार करण्यासाठी समिती नेमण्यात आली. या समितीने केलेल्या शिफारशीनुसार शासन ठराव क्रमांक :- एससीवाय - १३८३/ प्र.क्र.१५७/म-७,(१) दिनांक ४ मार्च,१९८९ नुसार पीक पैसेवारी पध्दत ठरविण्यात आली होती. तद्नंतर देखील लोकप्रतिनिधींकडून पुनर्विचार करण्याबाबतच्या मागण्या शासनाकडे सातत्याने येत होत्या व या विषयावर अनेक विधानसभा व विधानपरिषद प्रश्नही विचारण्यात येत होते. ही परिस्थिती लक्षात घेऊन तत्कालीन मा.मंत्री (महसूल) यांचे अध्यक्षतेखाली पीक पैसेवारी पद्धती आवश्यक असल्यास सुधारणा सुचविण्यासाठी एक समिती दिनांक १२.०३.१९९६ रोजी नेमण्यात आली होती. सदर समितीच्या शिफारशींवर प्रचलित पीक पैसेवारी पद्धतीत पीक पैसेवारी साठी लागवडीखालील ८० टक्के क्षेत्रातील पीके ही प्रमुख पीके म्हणून गणणे, जिल्हावार समितीमध्ये जिल्हाधिकाऱ्यांच्या

अध्यक्षतेखाली पिक समितीच्या कामावर देखरेख ठेवण्यासाठी एक समिती नेमण्यात येणे, या समितीवर सहकारी संस्थांचे निबंधक, अग्रणी बँकांचे प्रतिनिधी व जिल्हा शेती अधिकारी हे सभासद असणे, प्रत्येक जिल्ह्यासाठी एक "हवामान निरीक्षक गट" स्थापन करण्यात येणे, पीक कापणी प्रयोगांच्या संख्येत वाढ करणे इत्यादी बदल १९९७ च्या खरीप हंगामापासून करण्याचा निर्णय शासनाने घेतला होता. वरील बदल करुनही राज्यातील वारंवार निर्माण होणारी टंचाई परिस्थिती व त्या अनुषंगाने टंचाई सदृष्य परिस्थिती / टंचाई / दुष्काळ जाहिर करणे तसेच विविध उपाययोजना जाहीर करणे यासर्व बाबींकरता केवळ आणेवारीचे निकष लागू असल्यामुळे आणेवारी पध्दतीमध्ये बदल करण्याच्या दृष्टीने मागणी केली जात होती. आणेवारी पध्दतीत बदल करण्याबाबत विधीमंडळामध्ये चर्चेच्या अनुषंगाने आणेवारीच्या पध्दतीचा अभ्यास करुन यामध्ये बदल करणे आवश्यक आहे काय तसेच अन्य बाबी संदर्भात शिफारस करण्यासाठी केंद्र शासनाच्या धोरणाच्या अनुषंगाने शासन निर्णय दिनांक ६.४.२०१३ अन्वये विभागीय आयुक्त, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठीत करण्यात आली होती.

गठीत समितीच्या झालेल्या १० बैठका, तसेच अन्य राज्याच्या पैसेवारीबाबत समितीच्या सदस्यांनी कर्नाटक, आंध्रप्रदेश व गुजरात इत्यादी राज्यांच्या पीक पैसेवारीबाबतचा केलेला अभ्यास या सर्व बाबी विचारात घेऊन विभागीय आयुक्त, पुणे यांनी त्यांचा सविस्तर अहवाल दिनांक २३.७.२०१५ रोजी शासनास सादर केला. समितीच्या अहवालावर मंत्रीमंडळ उपसमिती व मंत्रीमंडळाच्या बैठकीत सविस्तर चर्चा होऊन पीक पैसेवारीबाबत समितीच्या अहवालातील शिफारशी स्विकारुन पिक पैसेवारीबाबत सर्वसमावेशक शासन निर्णय निर्गमित करणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पीक पैसेवारीबाबत विभागीय आयुक्त , पुणे यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या समितीने केलेल्या शिफारशी, याबाबत मंत्रिमंडळाने घेतलेला निर्णय व पीक पैसेवारीबाबत यापुर्वीचे शासन निर्णय या सर्व बाबी विचारात घेऊन पीक पैसेवारी पध्दतीबाबत खरीप हंगाम २०१५ पासून खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**१) पैसेवारी काढणे :-** नवीन तंत्रज्ञानाच्या वापराने पैसेवारी घोषित करण्याबाबत पथदर्शी प्रकल्प म्हणून राबवून याबाबतचा अहवाल कृषि विभाग/ विभागीय आयुक्त,पुणे यांच्याकडून उपलब्ध होऊन नवीन तंत्रज्ञानानुसार शास्त्रोक्त पध्दतीने पीक पैसेवारी घोषित करणे शक्य होई पर्यंत जुन्याच पध्दतीने पैसेवारी घोषित करण्यात यावी.

**२) पैसेवारी जाहीर करण्याच्या तारखा :-** हंगामी पैसेवारी , सुधारित हंगामी पैसेवारी व अंतिम पैसेवारी जाहीर करण्याच्या तारखा त्या त्या विभागातील हंगामानुसार खरीप व रब्बी पिकांकरीता खालीलप्रमाणे राहतील :-

| प्रचलित पैसेवारी तारखा (खरीप हंगाम) | | | | सुधारित पैसेवारी तारखा (खरीप हंगाम) | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **विभाग** | **हंगामी** | **सुधारित** | **अंतिम** | **विभाग** | **हंगामी** | **सुधारित** | **अंतिम** |
| कोकण | १५ सप्टें | ३१ ऑक्टो | १५ डिसें | कोकण | १५ सप्टें | ३१ आक्टो | १५ डिसें |
| पुणे, नाशिक | १५ सप्टें | ३१ आक्टो | १५ डिसें | पुणे, नाशिक | १५ सप्टें | ३१ आक्टो | १५ डिसें |
| औरंगाबाद | ३० सप्टें | १५ नोव्हें | १५ डिसें | औरंगाबाद | ३० सप्टें | ३१ आक्टो | १५ डिसें |
| नागपूर अमरावती | ३० सप्टें | १५ नोव्हें | **१५ जाने** | **नागपूर अमरावती** | ३० सप्टें | **३१ आक्टो** | **३१ डिसें** |

रब्बी पिकांच्या हंगामी / सुधारित हंगामी / अंतिम पैसेवारी घोषित करण्याच्या तारखांमध्ये कोणताही फेरबदल नसल्यामुळे सदर तारखा खालीलप्रमाणे राहतील.

| प्रचलित पैसेवारी तारखा (रब्बी) | | | |
|---|---|---|---|
| **विभाग** | **हंगामी** | **सुधारित** | **अंतिम** |
| कोकण | -- | -- | -- |
| पुणे, नाशिक | ३१ डिसेंबर | ३१ जानेवारी | १५ मार्च |
| औरंगाबाद | ३१ डिसेंबर | ३१ जानेवारी | १५ मार्च |
| नागपूर अमरावती | १५ जानेवारी | १५ फेब्रुवारी | १५ मार्च |

(टीप- नागपूर व अमरावती विभागात पैसेवारीसाठी तुरीला रब्बी पीक समजावे)

**३) पैसेवारी समिती :-**

राज्यातील सर्व जिल्हाधिकारी यांनी दरवर्षी १५ ऑगस्टपूर्वी प्रत्येक ग्राम पंचायतीसाठी पैसेवारी समिती गठीत करावी. पैसेवारी निश्चित करण्याकरीता पैसेवारी समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.

१. राजस्व निरीक्षक अथवा तत्सम अधिकारी- **अध्यक्ष**
   (उदा. मंडळ अधिकारी) (प्रत्येक ग्रामपंचायतीकरीता)
२. ग्रामसेवक - सदस्य
३. सरपंच - सदस्य
४. प्रगतशील शेतकरी - सदस्य
५. सहकारी पतपुरवठासंस्थेचे अध्यक्ष - सदस्य
६. अल्पभूधारक शेतकरी (दोन-सदस्य) (यापैकी एक सदस्य शक्यतो महिला असावी)
७. तलाठी - सदस्य
८. कृषि सहायक - सदस्य

प्रगतशील शेतकरी व दोन अल्पभूधारक शेतकरी यांची निवड संबंधित ग्रामपंचायतीने करावी. ही निवड वेळेवर न झाल्यास उरलेल्या सदस्यांची समिती अस्तित्वात राहील व कामकाज करेल.

ग्राम पैसेवारी समितीचे अध्यक्ष राजस्व निरीक्षक अथवा तत्सम अधिकारी हे आहेत, तरी मंडळातील गावांची विभागणी करुन प्रत्येक ग्राम पंचायतीसाठी स्वतंत्र अध्यक्ष व समिती असावी, व त्याकरीता राजस्व निरीक्षक,नायब तहसीलदार, अवल कारकुन, पंचायत समितीचे विस्तार अधिकारी, कृषि अधिकारी व इतर तत्सम अधिकारी यांना अध्यक्षस्थानी नेमावे.

**४) प्रमाण उत्पन्न:-**

केंद्र शासनाच्या सूचनांनुसार अन्य राज्याशी सुसंगत धोरण राहण्यासाठी मागील ५ वर्षांचे सरासरी उत्पादन हे प्रमाण उत्पन्न समजण्यात यावे. या प्रमाण उत्पन्नाचे मुल्यांकन १०० पैसे समजण्यात यावे. त्यानुसार पैसेवारी जाहीर करण्यात यावी. प्रमाण उत्पन्न निश्चित करण्यासाठी कृषि विभागामार्फत प्रत्येक तालुक्यामध्ये प्रमुख पिकांचे कमीतकमी २५ कापणी प्रयोग घेतले जावे.

**५) पैसेवारीचे सुत्र :-**

पैसेवारी काढण्यासाठी खालील सुत्राचा वापर करण्यात यावा.

$$१०० \times \frac{\text{पाहणी केलेले हेक्टरी उत्पादन}}{\text{प्रमाण उत्पादन}}$$

**६) प्रमुख पीक निश्चिती :-**

गाव पातळीवर पिकांच्या लागवडी खालील क्षेत्रामध्ये होत असलेले बदल लक्षात घेता, प्रमुख पीक निश्चिती करताना लागवडी खालील क्षेत्र ८० टक्के असावे.

**७) पीक कापणी प्रयोगांची संख्या व निवड :-**

प्रत्येक प्रमुख पीकांचे किमान ६ पीक कापणी प्रयोग घेण्यात यावे, मात्र हे प्रयोग ग्राम पंचायतवार करण्यात यावे. म्हणजेच प्रत्येक प्रमुख पिकासाठी एका ग्राम पंचायत क्षेत्रामध्ये किमान ६ प्रयोग घेणे आवश्यक राहील.

पीक कापणी प्रयोगाची जबाबदारी महसूल विभागाकडेच राहील. मात्र ग्राम पंचायत हे घटक धरुन ग्राम पंचायतवार प्रयोग करण्यात यावा. पैसेवारी ठरविण्यासाठी याद्दच्छीक नमूद पद्धतीनुसार पीक कापणी प्रयोगांसाठी शेत निवडण्यासाठी कृषि विभागांच्या अधिकाऱ्यांची मदत घेण्यात यावी.

**८) पैसेवारी जाहीर करण्यासाठी घटक :-**

पैसेवारी जाहीर करण्याकरीता महसूली गाव हा घटक धरण्यात यावा व महसूली गाववार पैसेवारी जाहीर करण्यात यावी.

**९)भारांकित सरासरी (Weighted Average) घेणे :-**

ग्राम पंचायतनिहाय प्रमुख पिकांच्या वरीलप्रमाणे कापणी प्रयोग झाल्यानंतर महसूली गावनिहाय प्रत्येक प्रमुख पिकांच्या पेरणी क्षेत्राचा प्रमाण व कापणी प्रयोगाअंती आलेली पैसेवारी यांच्या भारांकित सरासरी (Weighted Average) काढण्यात यावा व त्या सरासरीचा आकडा त्या महसूली गावाची पैसेवारी म्हणून जाहीर करावा.

**१०) खरीप / रब्बी पैसेवारी :-**

सर्व खरीप गावामध्ये खरीप हंगामामध्ये पैसेवारी घोषित करण्यात यावी. रब्बी गावामध्ये खरीप हंगामात २/३ किंवा त्यापेक्षा जास्त क्षेत्रावर पेरणी करण्यात आली असेल तर त्या रब्बी गावांच्या सुद्धा खरीप हंगामामध्ये पैसेवारी घोषित करण्यात यावी. इतर सर्व रब्बी गावामध्ये रब्बी हंगामात पैसेवारी घोषित करण्यात यावी.

**११) दुष्काळ जाहीर करण्याचे निकष :-**

राज्यात दुष्काळ जाहीर करण्यासाठी Drought Manual २००९ मधील खालील निकष ग्राह्य धरण्यात यावे व त्यासोबत एक प्रमुख निकष म्हणून पीक पैसेवारी हा निकष ग्राह्य धरण्यात यावा. निकषा बाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहेत.

**११.१ पर्जन्यमान:-**

**अ.** माहे जून व जूलै मध्ये एकुण सरासरीच्या ५० टक्क्यांपेक्षा कमी पर्जन्यमान झाल्यास

**ब.** संपुर्ण मान्सून कालावधीत सरासरीच्या ७५ टक्क्यांपेक्षा कमी पर्जन्यमान झाल्यास.

**क.** संपूर्ण मान्सून कालावधीत दोन आठवडयापेक्षा जास्त काळ पर्जन्यमानात खंड पडल्यास व त्यामुळे पीक परिस्थितीवर विपरित परिणाम झाल्यास याचा विचार करता येईल.

**११.२ लागवडीखालील क्षेत्र :-**

एकूण लागवडी खालील क्षेत्राच्या तुलनेत झालेल्या पेरणीचे प्रमाण ५०% पेक्षा कमी असल्यास.

**११.३ सामान्य फरक वनस्पती निर्देशांक :-**

सामान्य फरक वनस्पती निर्देशांक (NDVI)- ०.४ किंवा त्यापेक्षा कमी असल्यास

**११.४ आर्द्रता परिणाम :-**

पिकांचे आर्द्रता परिणाम (Moisture Adequacy Index) ५० पेक्षा कमी असल्यास

**११.५ पैसेवारी :-**

दुष्काळ जाहीर करण्यासाठी पीक पैसेवारी ५० पैशापेक्षा कमी असल्यास

**११.६ इतर निकष :-**

इतर निकषामध्ये चारा परिस्थिती, पिण्याच्या पाण्याची उपलब्धता इत्यादी.

## १२) दुष्काळ जाहीर करण्याची पध्दत :-

दुष्काळ जाहीर करण्यासाठी महसुली गाव हा घटक राहील. प्रथमत: वरील **११.१ “अ”, “ब” व “क”** ह्या निकषांचा विचार करण्यात येईल. ज्या महसुली मंडळामध्ये पर्जन्यमान माहे जून व जुलै मध्ये सरासरीच्या ५०% पेक्षा कमी असेल किंवा संपूर्ण मान्सून कालावधीत ( जून ते सप्टेंबर ) सरासरीच्या ७५% पेक्षा कमी असेल व दोन आठवड्यापेक्षा जास्त खंड पडून पीक परिस्थितीवर विपरित परिणाम झाला असेल अशा महसुली मंडळामध्ये समाविष्ठ महसूली गावांचाच दुष्काळ जाहीर करण्यासाठी विचार करण्यात येईल. वरील प्रमाणे निवडलेल्या मंडळातील गावांमध्ये वरील ६,७,८,९ व १० नुसार घोषित करण्यात आलेल्या पैसेवारीचा विचार करण्यात येईल. अशा महसुली गावांमध्ये पीक पैसेवारी ५० पैशांपेक्षा कमी असल्यास त्या महसुली गावांमध्ये दुष्काळ जाहीर करण्यात येईल. असे करताना वरील ११.२, ११.३, ११.४ व ११.६ ह्या निकषांचा ही विचार करण्यात येईल.

## १३) दुष्काळग्रस्त गावांना राज्य शासनाची उपाययोजना :-

दुष्काळ जाहीर केल्यानंतर राज्य शासनाकडून दुष्काळ ग्रस्त गावांसाठी/ शेतकऱ्यांसाठी देण्यात येणाऱ्या सोई सवलती खालीलप्रमाणे असतील :-

१) जमीन महसूलात सुट
२) सहकारी कर्जाचे पुनर्गठन
३) शेतीशी निगडीत कर्जाच्या वसुलीस स्थगीती
४) कृषि पंपाच्या चालू वीज बिलात ३३.५% इतकी सुट
५) शालेय / महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या परीक्षा शुल्कात माफी
६) रोहयो अंतर्गत कामांच्या निकषांत काही प्रमाणात शिथीलता
७) आवश्यक तेथे पिण्याचे पाणी पुरविण्यासाठी टँकर्सचा वापर
८) टंचाई जाहीर केलेल्या गावात शेतकऱ्यांच्या शेतीच्या पंपाची वीज जोडणी खंडीत न करणे.

## १४) NDRF निकषानुसार निविष्ठा अनुदान वाटप :-

एखादे गाव दुष्काळग्रस्त म्हणून जाहीर झाल्यानंतर त्यातील सर्व शेतकऱ्यांना निविष्ठा अनुदान देणे अपेक्षित नाही. अनेक शेतकऱ्यांच्या विहीरी असतात व विहीरीतील पाण्यावर ते बागायती करीत असतात. त्यामुळे दुष्काळग्रस्त भागातील कोरडवाहू शेती करणाऱ्या व ३३% पीक नुकसानग्रस्त शेतकऱ्यांना NDRF निकषानुसार निविष्ठा अनुदान देण्यात येईल. ३३ % पीक नुकसान ठरविण्यासाठी त्या ग्रामपंचायती क्षेत्रात घेण्यात आलेल्या पीक कापणी प्रयोगाच्या निकालानुसार येणाऱ्या पीक निहाय उत्पन्नाचा आधार ( weighted average काढण्यापूर्वी ) घेऊन ६७ टक्क्यापेक्षा कमी उत्पन्न आलेल्या कोरडवाहू पिकांखालील क्षेत्रास निविष्ठा अनुदानासाठी पात्र ठरविण्यात येईल व त्या शेतकऱ्यांना निविष्ठा अनुदान वाटप करण्यात येईल. यासाठी ग्रामपंचायत स्तरावर पीक निहाय काढण्यात आलेली उत्पन्न हे त्या ग्रामपंचायती मधील सर्व गावांना लागू राहील.

दुष्काळग्रस्त गावांमध्ये काही प्रमाणात बागायत व फळबाग क्षेत्रांवरही विपरीत परिणाम होतो. अशा परिस्थितीत बागायत व फळबाग क्षेत्रांचे शेती निहाय पंचनामा करून ३३ % पेक्षा जास्त नुकसान असलेल्या क्षेत्रास निविष्ठा अनुदान देण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५१११०१२२८०९३४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Ashok M Atram

Digitally signed by Ashok M Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, cn=Ashok M Atram
Date: 2015.11.10 12:33:55 +05'30'

**(अशोक आत्राम)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) सर्व विभागीय आयुक्त
२) सर्व जिल्हाधिकारी
३) सर्व मुख्य अधिकारी, महसूली विभाग
४) सर्व कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद / पाटबंधारे विभाग/ सार्वजनिक बांधकाम विभाग.
५) संचालक भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
६) सदस्य सचिव, महाराष्ट्र पाणी पुरवठा व जलनिस्सारण मंडळ, मुंबई
७) सर्व मुख्य अभियंता, ग्रामीण / नागरी, पाणी पुरवठा
८) प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरणे
९) आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) सर्व वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य
११) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर
१२) महालेखापाल १/२, (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर
१३) मुख्य व्यवस्थापक( पत पुरवठा), बँक ऑफ महाराष्ट्र, १५०१, लोकमंगल, शिवाजीनगर, पुणे-५
१४) महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, प्रादेशिक कार्यालय , ५४ वेलस्ली रोड, शिवाजीनगर, पुणे.
१५) सर्व मंत्रालयीन विभाग
१६) वित्त विभाग (व्यय-९)
१७) निवडनस्ती, कायार्सन म-७

**<u>प्रपत्र - अ</u>**

**(शासन निर्णय क्रमांक. एससीवाय-२०१३/प्र.क्र.२०७/म-७)**

**दिनांक :- ३ नोव्हेंबर, २०१५**

**पैसेवारी**

तलाठी साजा-

हंगामी /सुधारीत /अंतीम. खरीप /रब्बी पिकाचे नाव- गावाचे नांव- तालुका- जिल्हा-

| अ. क्र. | जिल्हा | तालुका | गावाचे नाव | एकुण लागवडी खालिल क्षेत्र | पेरणी केलेले क्षेत्र | पडीक क्षेत्र | पैसेवारी घोषित केलेला दिनांक | घोषित केलेली पैसेवारी (----पैसे) | अभिप्राय / शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| | | | | | | | | | |

स्वाक्षरी

तलाठी / तहसिलदार/ उपविभागीय अधिकारी/ जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त

शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :- एससीवाय-२०१३/प्र.क्र.२०७/म-७

दिनांक :- ३ नोव्हेंबर, २०१५

## सन------- सालातील खरीप / रब्बी पिकांच्या ------- पैसेवारीचा गोषवारा

## प्रपत्र – “ब”

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | तालुका | पैसेवारी जाहीर केलेली गावे | ५० पैशांपेक्षा कमी पैसेवारी असलेली गावे | ५० पैशांपेक्षा जास्त पैसेवारी असलेली गावे |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | १ | १ | १ | | | |
| | | | २ | | | |
| | | | ३ | | | |
| | | | . | | | |
| | | | . | | | |
| | | २ | १ | | | |
| | | | २ | | | |
| | | | ३ | | | |
| | | | . | | | |
| | | | . | | | |
| | | एकूण | | | | |
| | | राज्याची एकूण | | | | |